**मौजे वलगाव ता.जि. अमरावती या पूरग्रस्त गावातील नळ पाणी पुरवठा या नागरी सुविधेच्या कामाला प्रशासकीय मान्यता प्रदान नागरी सुविधा कामांकरिता अंशतः निधी उपलब्ध करून देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक एफएलडी-२०२१/प्र.क. ३३/२-१२**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक- २९ मार्च २०२३

वाचा:-

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.सीएलएस-११-०५/प्र.क्र.२३९/म-३ (विकाग), दि.३१-०७-२००९.
२) शासन शुध्दीपत्रक, महसूल व वन विभाग, क्र.आव्यप्र-२०११/प्र.क्र.९७/आव्यप्र-२,दि.०२-०९-२०१४
३) शासन पत्र, महसूल व वन विभाग क्र. एफएलडी २०२१/प्र.क.३३/र-१२, दि.०१-०७-२०२१

**शासन निर्णय:-**

संदर्भ क्रमांक ३ अन्वये मौजे वलगाव ता. जि. अमरावती या पुनर्वसित गावांमध्ये नळ पाणी पुरवठा या नागरी सुविधाच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मंजुरी देण्यात आली आहे. शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि. १७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार मौजे वलगाव ता. जि. अमरावती येथील पाणी पुरवठा या नागरी सुविधेच्या देयके अदा करण्यासाठी सन २०२२-२०२३ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रु.५,००,०००/- (रुपये पाच लक्ष फक्त) एवढा निधी विभागीय आयुक्त, अमरावती यांना "मागणी क्रमांक सी-६ २२४५ नैसर्गिक आपत्तींच्या निवारणासाठी सहाय्य, ०२ पूर, चक्रीवादळे, इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च, (९२) (०४) पुरामुळे बाधीत झालेल्या व्यक्तींच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, पाणी पुरवठा, -शाळा, चावडी, विद्युत पुरवठा, नागरी सुविधावरील खर्च (अनिवार्य) (दत्तमत) (२२४५ २२२९) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली विभागीय आयुक्त, अमरावती यांच्यामार्फत संबंधित कार्यन्वयन यंत्रणा कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणीपुरवठा विभाग, जिल्हा परिषद अमरावती यांना खालील अटींच्या अधिन राहून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

अटी व शर्ती

१) विभागीय आयुक्त, अमरावती यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित कार्यन्वयन यंत्रणेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा.

२) संबंधित कार्यन्वयन यंत्रणेने या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत, तदनुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, विभागीय आयुक्त, अमरावती व जिल्हाधिकारी, अमरावती यांना सत्वर सादर करावा.

३) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी ज्या मंजूर नागरी सुविधा कामाकरीता आला आहे त्याच कामासाठी खर्च करण्यात यावा. सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही व निश्चित केलेल्या कालावधीत कामे पूर्ण होईल. तसेच मंजूर निधी शासनाच्या पूर्व मान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित कार्यन्वयन यंत्रणेने दक्षता घ्यावी.

४) सदरच्या आदेशातील नमूद मुख्य लेखाशीर्षांतर्गत प्राप्त झालेला कोणताही निधी शिल्लक राहणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते ) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित कार्यन्वयन यंत्रणेने दक्षता घ्यावी.

५) सदरच्या आदेशातील नमूद मुख्य लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियंत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

६) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे / अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconciliation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

७) संबंधित कार्यन्वयन यंत्रणेने या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र Utilization Certificate महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावीत

८) यासंदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०२२-२०२३ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

३. वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी वरील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.

४. सदर निधी विभागीय आयुक्त, अमरावती यांना BEAMS प्रणालीवर तातडीने उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही महसूल व वन विभागाच्या म-११ कार्यासनाने करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक. २०२३०३२९१००६२१४२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHULARAM R NIKHARE

Digitally signed by CHULARAM R NIKHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=888a9197d5a4831c7e5ef0c4328259521ba94feaafdffb adf353be3592552a31, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E37123E923CF43F99F06B54384FF491E5F703F14D653B5A59D47EAB1F73E2597, cn=CHULARAM R NIKHARE
Date: 2023.03.29 13:04:28 +05'30'

**(चु. रा. निखारे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन), अमरावती विभाग, अमरावती.
२. जिल्हाधिकारी, अमरावती.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१,/ नागपूर-२ (२ प्रतीत)
७. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, /नागपूर-२ (२ प्रतीत)
८. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणीपुरवठा जिल्हा परिषद, जि.अमरावती
९. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
१०. वित्त विभाग, कार्यासन व्यय-९, अर्थसंकल्प-६, मंत्रालय, मुंबई-३२
११. महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी म-११/ब-१/पीएसी, मंत्रालय, मुंबई ३२.
१२. निवडनस्ती कार्यासन - र-१२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

***